(१४ पैकी शासन निर्णय क्र.१४)

**फौजदारी खटल्यातील सिध्दापराध प्रमाण वाढविण्यासाठी उपाययोजना करण्याबाबत.**

**पोलीस अधिका-यांच्या गोपनीय अहवालामध्ये दोषारोपसिध्दीची माहिती नमुद करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : डीपीपी-२०१२/प्र.क्र.१०/पोल-१०**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, दुसरा मजला,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : १२ मे, २०१५**

**प्रस्तावना :-**

पोलीस ठाण्यामध्ये फौजदारी स्वरुपाचा गुन्हा दाखल झाल्यानंतर अशा गुन्हयाच्या सर्वकष तपासाअंती न्यायालयामध्ये खटला दाखल करण्यात येतो. खटल्याच्या सुनावणीदरम्यान तपासी अधिकारी यांनी केलेल्या कौशल्यपूर्ण तपासावर सदर गुन्हयाचे दोषारोपसिध्दी अवलंबून असते. तपास अधिका-याने हाताळलेले तपास व त्यामध्ये झालेली दोषारोपसिध्दी याचा एकत्रित राज्यस्तरीय अभिलेख नसल्यामुळे दोषारोपसिध्दीबाबत विश्लेषण करणे शक्य होत नाही. सबब, राज्यातील सर्व गुन्हयांबाबत झालेल्या न्यायालयाच्या निर्णयाच्या अनुषंगाने स्वतंत्र अभिलेख ठेवणे व त्या अनुषंगाने तपास अधिकारी व वरिष्ठ पोलीस अधिकारी यांचे गोपनिय अहवाल लिहिताना सदरच्या बाबी विचारात घेण्याबाबत निर्देश देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील सर्व गुन्हयांबाबत झालेल्या न्यायालयाच्या निर्णयाच्या अनुषंगाने स्वतंत्र अभिलेख ठेवणे व त्या अनुषंगाने तपास अधिकारी व वरिष्ठ पोलीस अधिकारी यांचे गोपनीय अहवाल लिहिताना सदरच्या बाबी विचारात घेण्याचा निर्णय सदर शासन निर्णयान्वये घेण्यात येत आहे.

२. दिनांक १ जानेवारी २०१५ पासून प्रत्येक गुन्हा प्रकरणात न्यायालयाचे झालेले निर्णय व त्यामधील तपास अधिकारी याचा अभिलेख अपर पोलीस महासंचालक, (गुन्हे), महाराष्ट्र राज्य हे ठेवतील.

३. गोपनीय अहवाल लिहतेवेळी वरिष्ठ पोलीस अधिका-यांच्या मागणीनुसार सदरचे अभिलेख उपलब्ध करून देण्यात येईल.

४. पोलीस अधिकारी यांच्यासाठी वेगळा गोपनीय अहवालाचा मसुदा तयार करण्याकरिता खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

(अ) प्रधान सचिव / सचिव (विशेष),गृह विभाग.
(ब) पोलीस महानिरीक्षक (गुन्हा अन्वेषण विभाग),
(क) सह सचिव/उप सचिव, गृह विभाग
(ड) सह सचिव/उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग

५. भारतीय पोलीस सेवेतील अधिकारी व राज्य पोलीस सेवेतील पोलीस अधिका-यांचे गोपनीय अहवालामध्ये त्यांच्या तपास/पर्यवेक्षण क्षमतेचा समावेश करावा.

६. राज्य पोलीस सेवेतील अधिकारी यांनी गोपनीय अहवाल लिहिताना दोषसिध्दीबाबत बजावलेल्या कामगिरीचा आढावा घ्यावा.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक २०१५०५१२१७१७००९१२९ हा आहे. हा आदेश डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dattatray Santaram Patil

Digitally signed by Dattatray Santaram Patil
DN: CN = Dattatray Santaram Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.05.13 13:11:22 +05'30'

**(द.सं.पाटील)**
**उप सचिव, गृह विभाग,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय मुंबई.
३. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय मुंबई.
४. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य
५. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव,राजभवन, मुंबई
६. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
७. प्रधान सचिव (अपील व सुरक्षा),गृह विभाग, मंत्रालय मुंबई.
८. प्रधान सचिव व विधी परामर्श, विधी व न्याय विभाग मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव, विशेष, मंत्रालय, मुंबई
१०. महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय, मुंबई
११. सर्व पोलीस आयुक्त
१२. विशेष पोलीस महानिरीक्षक, सर्व परिक्षेत्र
१३. सर्व अपर पोलीस महासंचालक
१४. सर्व जिल्हाधिकारी
१५. सर्व प्रधान जिल्हा व सत्र न्यायाधीश
१६. सर्व पोलीस अधीक्षक
१७. संचालक, अभियोग, संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१८. मा.राज्यमंत्री (शहरे) यांचे खाजगी सचिव
१९. मा.राज्यमंत्री (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव
२०. सह सचिव/उप सचिव (पोल-१, पोल-१-अ, पोल-२, पोल-५-अ, पोल-५-ब)
२१. सर्व सह सचिव/उप सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
२२. सर्व कार्यासने, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
२३. निवडनस्ती